सरकारी वकीलांचे कार्यालय, उच्च न्यायालय, नागपूर यांना नवीन संगणक सामुग्री खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता व निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
विधि व न्याय विभाग
शासन निर्णय क्र. संप्रिसा-२०२१/प्र.क्र.३८/कार्या.०७
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १८ फेब्रुवारी, २०२२.

वाचा :-१) विधि व न्याय विभाग, प्रशासकीय इमारत क्र. १, सिव्हिल लाईन्स, नागपूर यांचे पत्र क्र. जीपीएन-१०२१/सं. क्र. ४००४/२०२१, दिनांक २६.११.२०२१.

प्रस्तावना :-

विधि व न्याय विभाग, नागपूर यांनी संदर्भाधीन पत्रान्वये सरकारी वकीलांचे कार्यालय, उच्च न्यायालय, नागपूर कार्यालयाकरिता संगणक सामुग्री खरेदी करण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला होता. सदर प्रस्तावास माहिती तंत्रज्ञान संचालनालय व वित्त विभागाने सहमती दर्शविली आहे. यानुषंगाने संगणक सामुग्री खरेदी करण्याच्या प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

सरकारी वकीलांचे कार्यालय, उच्च न्यायालय, नागपूर कार्यालयाकरिता संगणक सामुग्री खरेदी करण्याच्या रु. **११,१९,१९०/-** (अक्षरी रु. अकरा लक्ष एकोणीस हजार एकशे नव्वद फक्त) इतक्या रकमेच्या प्रस्तावास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता व निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

२. याबाबतच्या संगणक सामुग्रीचा तपशिल पुढीलप्रमाणे आहे:-

| अ. क्र. | संगणक सामुग्री | नग | प्रती नग रु. | एकूण रु. |
|---|---|---|---|---|
| १. | संगणक (All in One PC) | १२ | ७५,०००/- | ९,००,०००/- |
| २. | लेझर प्रिंटर्स | १२ | १४,९००/- | १,७८,८००/- |
| ३. | स्कॅनर्स | ०१ | ४०,३९०/- | ४०,३९०/- |
| | **एकूण** | **२५** | | **११,१९,१९०/-** |

३. याद्वारे रु. ११,१९,१९०/- इतका निधी जे- ०० ४९ यांना वितरीत करण्यात येत आहे.

४. सदर खरेदी उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या शासन निर्णय दिनांक १.१२.२०१६ मधील तरतुदीनुसार आणि दिनांक २४.०८.२०१७ व ८.१२.२०१७ रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार GeM पोर्टलवरुन विहित पध्दतीने करण्यात यावी.

५. याप्रित्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र. जे-२, २०५२ सचिवालय सर्वसाधारण सेवा, (००) विधी व न्याय विभाग, (००) (०२) ई-गव्हर्नन्स प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी तरतूद (२०५२ ५११६) - १७ संगणक खर्च" या लेखाशिर्षाखाली वित्तीय वर्ष२०२१-२२ मध्ये करण्यात आलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

६. सदर शासन ज्ञापन वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-१ उप विभाग-२ मधील अ. क्र. २७ (अ) नियम क्र. ७६ मधील २ व ३ या अटींच्या अनुषंगाने प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ११४/२०२२/ व्यय-५, दिनांक ०२.०२.२०२२ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र विहित नमुन्यात त्वरीत महालेखापाल कार्यालयास व शासनास सादर करावे.

८. सदर अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे. त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०२१८१२५९४१३९१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NITIN V JIWANE

Digitally signed by NITIN V JIWANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=eaafa52b8f5b995089773c42d6ed2475cd061a337b724d471400fbcfb074e051, pseudonym=00D295F198C67FDB7031897066C5804DA623172E, serialNumber=38DA45FC182DE9210D4220CD41371018A4D6F00892E5D1478CBA8413AFB06C03, cn=NITIN V JIWANE
Date: 2022.02.18 13:02:02 +05'30'

**( नितीन वि. जिवने )**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव.**

**प्रति,**

१. सरकारी वकीलांचे कार्यालय, उच्च न्यायालय, दक्षिण इमारत, १ ला माळा, सिव्हील लाईन्स, नागपूर.

२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता),-१/ २, मुंबई/नागपूर,

३. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१/२, मुंबई/नागपूर,

४. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,

५. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,

६. प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई,

७. संचालक, माहिती तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई,

८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

९. संचालनालय, लेखा व कोषागारे, ठाकरसी हाऊस ३, मुंबई पोर्ट ट्रस्ट, २ रा मजला, शुरजी वल्लभदास मार्ग, बेलार्ड इस्टे, मुंबई.

१०. लेखा कोषागार कार्यालय, नागपूर.

११. कार्यासन अधिकारी १३, २३ व २४, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई,

१२. निवड नस्ती.